शासकीय व अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठीच्या सन २०१५-२०१७ या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती याबाबतची नियमावली.

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः बीएड-४६१५/प्र. क्र.७०/भाग-१/मशि-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीखः २९ जून, २०१५.

<u>वाचा</u>:-

१) शासन निर्णय क्रमांकः एनजीसी २००४/(४१/०४/मशि-३, दिनांक १६ फेब्रुवारी, २००४.
२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/बी.एड. सी.ई.टी./२०१५-२०१६/बी.एड./४०७६, दिनांक २४.४.२०१५.
३) शासन निर्णय क्रमांक : बीएड-४६१५/प्र. क्र.७०/१५/मशि-२, दिनांक ६ जून, २०१५.
४) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/बी.एड. सी.ई.टी./२०१५-२०१६/बी.एड./५६७२, दिनांक १०.६.२०१५.

<u>शासन शुध्दीपत्रक</u> :-

उपरोक्त संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयामध्ये खालील तक्त्यामध्ये नमूद केलेले नियम क्रमांक सुधारीत तरतुदीप्रमाणे वाचण्यात यावेत.

| नियम क्रमांक | शासन निर्णय क्रमांक-बीएड-४६१५/प्र.क्र.७०/१५/मशि-२, दिनांक ६.६.२०१५ मधील तरतुदी | सुधारीत तरतुदी |
|---|---|---|
| | विषय: शासकीय व अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठीच्या सन २०१५-२०१६ या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती याबाबतची नियमावली | विषय: शासकीय व अशासकीय अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित अध्यापक महाविद्यालयातील नियमित बी.एड. **दोन वर्षाच्या** अभ्यासक्रमाच्या **सन २०१५-१७** या शैक्षणिक वर्षासाठी शिक्षण शुल्क व प्रवेश पद्धती याबाबतची नियमावली |

| | | |
|---|---|---|
| | वाचा :<br>१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक एनजीसी २००४/(४१/ ०४ )/मशि-३, दिनांक १६ फेब्रुवारी, २००४.<br>२. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/बी.एड.सी.ई.टी./२०१५-२०१६/बी.एड./४०७६, दिनांक २४.०४.२०१५. | वाचा :<br>१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक एनजीसी २००४/(४१/०४)/मशि-३, दि. १६ फेब्रुवारी, २००४.<br>२. **राष्ट्रीय अध्यापक शिक्षा परिषद, नवी दिल्ली अधिसूचना दिनांक २८.११.२०१४.**<br>३. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/बी.एड.सी.ई.टी./२०१५-२०१६/ बी.एड./४०७६, दिनांक २४.०४.२०१५. |
| | **शासन निर्णय :**<br>सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षासाठी बी.एड.(पूर्णवेळ,नियमित) अभ्यासक्रमास प्रवेश घेण्यासाठी नियमावली विहित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक २४.०४.२०१५ च्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्तावास अनुसरुन पुढील बी.एड. अभ्यासक्रम प्रवेश नियमावलीस शासन मान्यता देण्यात येत आहे. | **शासन निर्णय :**<br>**एनसीटीईच्या २०१४ च्या अधिसूचनेप्रमाणे राज्यात वर्ष २०१५-१६ पासून बी.एड अभ्यासक्रम दोन वर्षाचा होत आहे. सन २०१५-१७ या शैक्षणिक वर्षासाठीच्या बी.एड. (पूर्णवेळ,नियमित) प्रथम वर्ष अभ्यासक्रमास प्रवेश घेण्यासाठी नियमावली** विहित करण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक २४.०४.२०१५ च्या पत्रान्वये सादर केला आहे. सदर प्रस्तावास अनुसरुन पुढील बी. एड. अभ्यासक्रम प्रवेश नियमावलीस शासन मान्यता देण्यात येत आहे. |
| १.१ (अ) | महाराष्ट्रातील शासकीय, अशासकीय अनुदानित, अशासकीय विनाअनुदानित/ कायम विनाअनुदानित व अल्पसंख्यांक संस्था संचलित अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयांमध्ये नियमित बी.एड. अभ्यासक्रमासाठी द्यावयाचे प्रवेश सामाईक प्रवेश परीक्षा (Common Entrance Test ) (CET) घेऊन केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारे (Govt. Common Admission Process)(Govt. CAP) करण्यात येतील.<br>सदर प्रवेश प्रक्रियेची कार्यवाही संगणकामार्फत Online पध्दतीने करण्यात येणार आहे. | महाराष्ट्रातील शासकीय, अशासकीय अनुदानित, अशासकीय विनाअनुदानित/ कायम विनाअनुदानित व अल्पसंख्यांक संस्था संचलित अनुदानित, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र महाविद्यालयांमध्ये बी.एड. (नियमित) प्रथम वर्ष अभ्यासक्रमासाठी द्यावयाचे प्रवेश सामाईक प्रवेश परीक्षा (Common Entrance Test ) (CET) घेऊन केंद्रीय प्रवेश प्रक्रियेव्दारे (Govt. Common Admission Process)(Govt. CAP) करण्यात येतील.<br>सदर प्रवेश प्रक्रियेची कार्यवाही संगणकामार्फत Online पध्दतीने करण्यात येणार आहे. |

| | | |
|---|---|---|
| १.१(ब) | | **वर्ष २०१५-१६ पासून बी.एड अभ्यासक्रम २ वर्षांचा करण्यात आला आहे. बी.एड अभ्यासक्रमाच्या प्रवेशासाठी फक्त प्रथम वर्षाला सीईटी घेण्यात येणार असून प्रथम वर्ष उत्तीर्ण झाल्यानंतर संबंधित उमेदवारास त्याच महाविद्यालयात द्वितीय वर्षासाठी विहीत शुल्क भरुन आपोआप प्रवेश घेता येईल.** |
| २.१ (अ) (१) | मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या विज्ञान व गणित/सामाजिक शास्त्रे (इतिहास/भूगोल/अर्थशास्त्र/राज्यशास्त्र/ मानसशास्त्र/तत्वज्ञान/शिक्षण/ग्रंथालय शास्त्र) तसेच मानव्यशास्त्रे (सर्वभाषा व साहित्य) विद्याशाखेची ३ वर्षाची पदवी/पदव्युत्तर अभ्यासक्रमा पूर्ण केला असेल व पदवी किंवा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५० टक्के (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व., व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ४५ टक्के गुण (४४.५० टक्के ते ४४.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ४५ टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५० टक्के गुण प्राप्त केले आहेत (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एड प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>अभियांत्रिकी व तंत्रज्ञान मध्ये (गणित व विज्ञान विषय विशेष म्हणूनअसलेले) उमेदवार तसेच मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या २.१ (अ) मधील सोडून इतर सर्व विद्याशाखांच्या | मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या बी.एस्सी (विज्ञान व गणित इ.), बी. ए. (सामाजिक शास्त्रे (इतिहास/भूगोल/अर्थशास्त्र/राज्यशास्त्र/मानसशास्त्र/तत्वज्ञान/शिक्षण/ग्रंथालय शास्त्र इ.)) तसेच बी. ए. (मानव्यशास्त्रे (भाषा व साहित्य)) विद्याशाखेची ३ वर्षाची पदवी/पदव्युत्तर अभ्यासक्रमा पूर्ण केला असेल व पदवी किंवा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५० टक्के (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व., व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ४५ टक्के गुण (४४.५० टक्के ते ४४.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ४५ टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५० टक्के गुण प्राप्त केले आहेत (४९.५० ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एड प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>अभियांत्रिकी व तंत्रज्ञान मध्ये (गणित व विज्ञान विषय विशेष म्हणूनअसलेले) उमेदवार तसेच मान्यता प्राप्त विद्यापीठाच्या २.१ (अ) मधील सोडून इतर सर्व विद्याशाखांच्या पदव्या (उदा.वाणिज्य, व्यवस्थापन, अभियांत्रिकी, संगणक, विधी,माहिती तंत्रज्ञान, कृषि, बी.बी.आय., वैद्यकशास्त्र, समाजशास्त्रातील २.१ मध्ये नमूद केलेले विषय सोडून इतर विषय, फाईनआर्ट, परफॉर्मिंग आर्ट-संगीत/नृत्य/नाटय इ.) तसेच महाराष्ट्र शासनाने पदवी समकक्षता दिलेला कोणताही अभ्यासक्रम पूर्ण केला असेल व पदवीला किंवा पदव्युत्तर अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५५ टक्के गुण (५४.५० ते ५४.९९ |

| | | |
|---|---|---|
| | पदव्या (उदा.वाणिज्य, व्यवस्थापन, अभियांत्रिकी, संगणक, विधी,माहिती तंत्रज्ञान, कृषि, बी.बी.आय., वैद्यकशास्त्र, समाजशास्त्रातील २.१ मध्ये नमूद केलेले विषय सोडून इतर विषय, फाईनआर्ट, परफॉर्मिंग आर्ट - संगीत/नृत्य/नाटय इ.) तसेच महाराष्ट्र शासनाने पदवी समकक्षता दिलेला कोणताही अभ्यासक्रम पूर्ण केला असेल व पदवीला किंवा पदव्युत्तर अभ्यासक्रमाला खुला संवर्गातील उमेदवाराला किमान ५५ टक्के गुण (५४.५० ते ५४.९९ टक्के पर्यतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील.) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व., व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ५० टक्के गुण (४९.५० टक्के ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५५ टक्के गुण प्राप्त केले आहेत (५४.५० ते ५४.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एड‍ प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>दोन वर्षाच्या किंवा एक वर्ष अभ्यासक्रमाची पदवी धारण करणारे पदवीधारक उमेदवार (मुक्त विद्यापीठातील पदवीप्राप्त उमेदवार वगळून) बी.एड. प्रवेशास पात्र राहणार नाहीत. यास महाराष्ट्र शासनाने पदवी समकक्षता दिलेले १/२ वर्षीय अभ्यासक्रम अपवाद राहतील. | टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील.) व मागासवर्गीय संवर्गातील (अ.जा., अ.ज., वि.जा.भ.ज., इ.मा.व., व वि.मा.प्र.) ज्या उमेदवारांना किमान ५० टक्के गुण (४९.५० टक्के ते ४९.९९ टक्के पर्यंतचे गुण धारकांचे गुण ५० टक्के इतके गणण्यात येतील.) महाराष्ट्राबाहेर विद्यापीठातील पदवी प्राप्त सर्व संवर्गातील ज्या उमेदवारांनी किमान ५५ टक्के गुण प्राप्त केले आहेत (५४.५० ते ५४.९९ टक्के पर्यंतचे गुणधारकांचे गुण ५५ टक्के इतके गणण्यात येतील) असे उमेदवार बी.एड‍ प्रवेशासाठी घेण्यात येणाऱ्या सामाईक प्रवेश परीक्षेस (CET) बसण्यास व बी.एड. प्रवेशास पात्र राहतील.<br>दोन वर्षाच्या किंवा एक वर्ष अभ्यासक्रमाची पदवी धारण करणारे पदवीधारक उमेदवार (मुक्त विद्यापीठातील पदवीप्राप्त उमेदवार वगळून) बी.एड. प्रवेशास पात्र राहणार नाहीत. |

| | | |
|---|---|---|
| २.१(क) | | **खालील १, २ आणि ३ पैकी कोणत्याही एकाच संवर्गासाठी उमेदवाराशी नाते व संबंधितास सवलत देय असल्याचे सक्षम अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र सादर केल्यास संबंधित उमेदवारास (दोन टक्के) अतिरिक्त गुण देण्यात येतील.<br>(१) स्वातंत्र्य सैनिकांची मुले/मुली/पती/ पत्नी यांना,<br>(२) प्रकल्पग्रस्त/भुकंपग्रस्त कुटूंबातील उमेदवारांना<br>(३) परित्यक्ता/घटस्फोटीत महिला/विधवांना.** |
| १२ (अ)(१) | या पुस्तिकेतील नियम क्र. २.१(अ) नुसार प्राप्त गुण. | या पुस्तिकेतील नियम क्र. २.१(अ) नुसार प्राप्त गुण **आणि नियम २.१(क) नुसार प्राप्त अतिरिक्त गुणांची बेरीज करुन उमेदवारास प्राप्त झालेल्या गुणांकाचे ५० टक्के गुण.** |
| २२.१ | प्रवेशित उमेदवारांची कोणत्याही परिस्थितीत परस्पर अदलाबदल (Mutual Transfer) केली जाणार नाही. तथापि, अपवादात्मक परिस्थितीत मा.संचालक (उच्च शिक्षण) यांच्या मान्यतेने महाविद्यालय सुरु होण्यापूर्वी १५ दिवसांच्या आत व जर महाविद्यालय सुरु झाल्यानंतर प्रवेश मिळाला असल्यास ८ दिवसांच्या आत अशी अदलाबदल करता येईल. यासाठी संबंधित उमेदवारांनी खालील पध्दती अवलंबवावी : | प्रवेशित उमेदवारांची कोणत्याही परिस्थितीत परस्पर अदलाबदल (Mutual Transfer) केली जाणार नाही. तथापि, अपवादात्मक परिस्थितीत मा.संचालक (उच्च शिक्षण) यांच्या मान्यतेने महाविद्यालय सुरु होण्यापूर्वी **प्रथम वर्षी** १५ दिवसांच्या आत व जर महाविद्यालय सुरु झाल्यानंतर प्रवेश मिळाला असल्यास ८ दिवसांच्या आत अशी अदलाबदल करता येईल. यासाठी संबंधित उमेदवारांनी खालील पध्दती अवलंबवावी : |

२. तसेच उपरोक्त संदर्भ क्रमांक-३ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद-१ मध्ये “बी.एड प्रवेश:शैक्षणिक वर्ष २०१५-२०१६” या मजकुराऐवजी “बी.एड प्रवेश:शैक्षणिक वर्ष २०१५-२०१६”, नियमावलीच्या तक्यातील नियम क्र.५ नंतर “७” ऐवजी “६” व “७.१” ऐवजी “६.१” असे वाचण्यात यावे.

३. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२९१२५१४८६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Urmila Vaibhav Joshi

Digitally signed by Urmila Vaibhav Joshi
DN: CN = Urmila Vaibhav Joshi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.29 12:58:09 +05'30'

**(उर्मिल जोशी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालय,
३. कुलसचिव, महाराष्ट्रातील सर्व अकृषि विद्यापीठे,
४. सदस्य सचिव, प्रवेश नियंत्रण व शिक्षण शुल्क समिती, शासकीय तंत्रनिकेतन, खेरवाडी, वांद्रे (पूर्व), मुंबई,
५. सचिव, विना अनुदानित अध्यापक महाविद्यालये संस्था चालक असोसिएशन, प्लॉट नं.८, एम. यु. इंटरनॅशनल स्कुल समोर, रोझाबाग, एन-१२, सिडको, औरंगाबाद-४३१ ००१.
६. निवड नस्ती (मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.